62\D:\PUSHPA\PRS2\AUGUST\035

मुंबई मध्यवर्ती कारागृह येथे सेल/मोबाईल फोन
जॅमर संचाची मांडणी करणेबाबत.

## महाराष्ट्र शासन
## गृह विभाग

शासन निर्णय क्र. एमाएजे-०१२१/६/(१२६)पीआरएस-२, मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक:- १९ ऑगस्ट, २००३

वाचा १) कारागृह उपमहानिरीक्षक, (मुख्यालय) पुणे यांचे क्र.बीएलडी /मुंमका / जॅमर/२००१/क.६, दिनांक २१ मे २००३ चे पत्र.
२) सहसचिव, गृह विभाग यांचे क्र. एसयुपी११०३/पु.मा (पावसाळी अधिवेशन) सीआर-४० /बीयुडी-१, दिनांक ५ ऑगस्ट २००३ चे पत्र.

**प्रस्तावना:-** मुंबई मध्यवर्ती कारागृह हे अतिसंवेदनशील असे कारागृह असून या कारागृहात विविध प्रकारच्या गँगचे गँगवार बंदी तसेच अतिरेकी संघटनेचे खतरनाक बंदी बंदीस्त आहेत. त्यामुळे सदरच्या बंदिस्त बंद्यांना त्यांचे नातेवाईक व गुन्हेगार हे मुलाखतीला ( भेटीला) आल्यावर मेन गेटच्या बाहेरुन मोबाईलवर बंद्यांशी संपर्क साधतात अथवा त्यातील काही बंदी कारागृहाच्या आतील भागात (बॅरकोमध्ये ) गैरमार्गाने मोबाईल फोन मिळवुन त्याव्दारे घातपाती कारवाया, खंडणी वसुली, धमकी अशाप्रकारचे संभाषण करण्याचा प्रयत्न करीत असतात. अशा स्वरुपाचे सेल/ मोबाईल फोनव्दारुन संपर्क साधणे हे कारागृह प्रशासन व सुरक्षिततेच्या दृष्टीने अत्यंत धोकादायक आहे. अशा गैरव्यवहारांवर नियंत्रण ठेवण्याची नितांत आवश्यकता असून त्याअनुषंगाने कैदी व इतर गुन्हेगार यांच्यातील मोबाईलवरील संभाषण रोखून त्याव्दारे गुन्हेगारी कारवायांवर नियंत्रण ठेवण्यासाठी मुंबई मध्यवर्ती तुरुंग येथे सेल/ मोबाईल दूरध्वनी जामर यंत्रणा बसविणे आवश्यक असल्याने ती उपरोक्त कारागृहात बसविण्यास व त्यासाठी लागणारा रु. ६.०२ लाख इतका निधी उपलब्ध करुन देण्याबाबत कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय) पुणे यांनी शासनास विनंती केली आहे.

**शासन निर्णय :-** मुंबई मध्यवर्ती कारागृह हे अतिसंवेदनशील असल्याने या कारागृहातील कैदी व इतर गुन्हेगार यांच्यातील मोबाईल सेल फोनवरील संभाषण रोखून त्याव्दारे गुन्हेगारी कारावायांवर नियंत्रण ठेवणे तसेच कारागृह प्रशासन व सुरक्षिततेच्या दृष्टीने मुंबई मध्यवर्ती कारागृहासाठी सेल/ मोबाईल फोन जामर संच/ यंत्रणा बसविण्यास व त्यासाठी लागणा-या रु. ६,०२,०००/- (रुपये सहा लाख दोन हजार फक्त) इतक्या रकमेच्या खर्चास शासन या आदेशाव्दारे मान्यता देत आहे.

याबाबत होणारा खर्च " मुख्यलेखा शिर्ष २०५६ तुरुंग, १०१ तुरुंग (००) (०१) मध्यवर्ती तुरुंग ३१, हत्यारे व संयंत्रे (२०५६००३५) या लेखाशिर्षाखाली टाकण्यात यावा व तो सन २००३-२००४ या वित्तीय वर्षासाठी वर नमूद दि. ५ ऑगस्ट २००३ च्या पत्राव्दारे उपलब्ध करुन देण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.

62\D:\PUSHPA\PRS2\AUGUST\035

सीआरद९५/२००३/व्यय-८, दि. १३.६.०३ व प्र.क्र. ६४४/अर्थ१० दि. २१.६.०३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

(र.ना. माळी)
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे
कारागृह उप महानिरीक्षक(मुख्यालय) मुंबई
कारागृह अधिक्षक, मुंबई मध्यवर्ती कारागृह
महालेखापाल महाराष्ट्र १/२ ( लेखा व अनुज्ञेयता )मुंबई,नागपूर
महालेखापाल महाराष्ट्र १/२ ( लेखा परिक्षा )मुंबई,नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी वांद्रे, मुंबई.
अव सचिव( पोयुडी-१ )गृह विभाग मंत्रालय, मुंबई
कक्ष अधिकारी . व्यय-८,वित्त विभाग
अर्थ-१० वित्त विभाग. मंत्रालय. मुंबई.
निवड नस्ती .पीआरएस-२